# नाचणारे बदक

लेखक : सिड



# नाचणारे बदक

मराठी : अश्विनी बर्वे





एक दिवस एक छोटं बदका तलावात नाचू लागलं.

इतर बदकं त्याला बघून खूप हसली.
पण आईला छोट्या बदकाचे नाचणं आवडलं नाही.

“ऐक, बदका," आई छोट्या बदकाला म्हणाली.
“आपल्या भावंडाप्रमाणे सरळ रेषेत पोहत रहा.”
पण छोट्या बदकाला नाचायला खूप मजा येत होती.

बदकाचं पिल्लू नाचत नाचत तलावाच्या बाहेर आलं.

मग ते शेतात नाचलं.



छोट्या डुकराने त्याला नाचतांना पाहिलं.
पण ते चिखलात आपल्या आई सोबतच थांबलं.



कोंबडीच्या पिल्लांनी सुद्धा छोट्या बदकाला
नाचतांना पाहिलं. पण ते सुद्धा आपआपल्या कामात
व्यग्र राहिले. पण तरीही बदक थांबलं नाही.



बदक नाचत नाचत शेताच्या मालकाच्या घरात गेलं. “बघतर आपल्या घरी कोण आलं आहे?” शेतकरी म्हणाला. “नाचणारं बदक आहे असं वाटतं,” शेतकऱ्याची बायको म्हणाली.



बदक घरात नाचत राहिलं.
ते कोणत्याही फर्निचरवर धडकलं नाही.



शेतकऱ्याने आणि त्याच्या बायकोने बदकाला स्वयंपाक घराच्या ओट्यावर नाचतांना पाहिलं. नाचतांना त्याने एकही भांड फोडलं नाही. “ते खूप सुंदर नाचतं आहे,” शेतकरी म्हणाला. “सगळ्यांनी त्याचा नाच पाहिला पाहिजे,” शेतकऱ्याची बायको म्हणाली.



मग ते त्या बदकाला आपल्या गाडीत घेवून शहरात गेले.




तिथं ते त्याला एका थिएटर मध्ये घेवून गेले.
थिएटरमध्ये शो बघायला खूप लोक आले होते.
“आता तू इथे आपला नाच दाखव,” शेतकरी
बदकाला म्हणाला.

.



बदक स्टेज वर नाचू लागलं.



ते खुर्च्यांच्या मधल्या गल्लीत सुद्धा नाचले.

"वाह! काय नाचतं बदक!”

सगळे लोक त्याला बघून ओरडले, “या बदकाचे कौशल्य राष्ट्रीय टेलीविजनवर दाखवायला हवं,” शेतकऱ्याची बायको म्हणाली.




मग ते बदकाला घेवून टेलीविजन स्टेशन वर गेले.





तिथं बदक कॅमेऱ्या समोर सुंदर नाचलं.

लाखों लोकांनी बदकाचा नाच
आपआपल्या टीव्ही वर बघितला.



त्यानंतर बदक खूप प्रसिद्ध आणि लोकप्रिय झालं. लोक रस्त्यावर त्याचा पाठलाग करत. मुलं त्याची सही मागत. अनेकांना त्याचे पंख हवे होते.




त्यानंतर जगभर त्याचा फॅन क्लब सुरु झाला. अंटार्कटिका मध्ये सुद्धा.




एका रात्री हॉलीवुडच्या प्रसिद्ध सिने-सितारांचा जलसा होता.सगळ्यात चांगल्या सिने-सिताऱ्याला पुरस्कार मिळणार होता. आपल्याला प्रिय असणाऱ्या सिनेसिताऱ्याला बघण्यासाठी लोकांनी खूप गर्दी केली होती. त्यांचे प्रिय नट-नट्या उतरल्या की लोक टाळ्या वाजवत.



जेव्हा बदक आपल्या गाडीतून खाली उतरले तेव्हा त्याचे प्रशंसक वेडे झाले. बदक! बदक! बदक! असे ते ओरडले.!



जजने बदकाला गोल्डन डक अवार्ड देवून सन्मानित केलं.
“तुमचे खूप खूप आभार,” बदक म्हणाले.
त्यानंतर बदकाने नाच सुरु केला.



ते नाचलं, आणि खूप वेळ पर्यंत नाचत
राहिलं. शेवटी ते थकून गेलं.



शेवटी शेतकरी आणि त्याची बायको बदकाला उचलून घेवून आपल्या फार्मवर परत आले.



फार्मवर आल्यावर बदक पळत पळत आपल्या तलावाकडे परत आलं. आता त्याला फक्त आपल्या परिवार बरोबर पाण्यात पोहायचं होतं.





"घरात तुझं स्वागत आहे," आई बदकाला म्हणाली. “तू एक चांगलं मुल आहे, मला तुझा अभिमान वाटतो.”

“आता तू आपल्या भावंडाबरोबर एक सरळ रेषेत पोहत रहा.” हे ऐकून बदक खूप खुश झालं.



बदक एकदा परत नाचलं फक्त
आपल्या आईसाठी..

समाप्त